**'शशासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाच्या उमेदवारांना व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना. (मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण)**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग**

शासन निर्णय क्रमांक : इमाव २००३/प्र.क्र.२०८/मावक-३

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक :- २५ जुलै, २००३.**

**प्रस्तावना :-** राज्यातील अनुसूचित जातीमधील अल्पशिक्षित उमेदवारांना औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये उपलब्ध असलेल्या प्रशिक्षण सुविधांचा व साधनसामुग्रींचा यथायोग्य वापर करुन अल्प कालावधीचे प्रशिक्षण देऊन या प्रशिक्षित उमेदवारांना स्वयंरोजगार मिळवून देण्यासाठी व सेवाविषयक कामे करण्याची संधी मिळावी याकरीता शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून अनुसूचित जातीच्या उमेदवारांना व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना (मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण) शासन निर्णय क्रमांक **ईबीसी-२००३/प्र.क्र.१८८/मावक २, दिनांक ४ जुलै, २००३** अन्वये लागू करण्यात आली आहे. त्याची प्रत सोबत जोडली आहे. त्याच धर्तीवर सदरहू योजना विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाच्या उमेदवारांना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** वरील सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन शासन आता विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाच्या उमेदवारांसाठी "शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधून व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना (मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण )" अनुसूचित जातीच्या प्रशिक्षण योजनेच्या धर्तीवर लागू करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर योजनेकरीता येणारा खर्च तातडीची गरज म्हणून आकस्मिकता निधीमधून अग्रिम म्हणून रु. १,०५,००,०००.०० (रुपये एक कोटी पाच लाख फक्त ) शासन ज्ञापन वित्त विभाग क्रमांक आकनि-११०३/ ४०/अर्थसंकल्प-५, दिनांक २२.७.२००३ (संगणक संकेतांक क्रमांक:८०००-०४०-८) अन्वये आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात येत आहे. हा क्रमांक खर्चाच्या देयकावर तांबडया शाईने लिहून अधोरेखित करावा. याबाबतचे विवरणपत्र वित्त विभाग तसेच सह संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई यांना पाठवावे.

३. याबाबत होणारा खर्च "२२२५,अनु.जाती,अनु.जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण ०३-मागासवर्गीयांचे कल्याण २७७ शिक्षण ,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (राज्य योजनांतर्गत योजना)(०२) (१६) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून राज्यातील विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील उमेदवारांना व्यावसायिक प्रशिक्षण देण्याची योजना (मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण)(२२२५ ३२० ६) ४०-शिष्यवृत्त्या/विद्यावेतने-मागणी क्रमांक एन - ४ " या अर्थशीर्षाखाली खर्ची घालून त्याखाली करण्यात आलेल्या चालू आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. संचालक, (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. यावरील तरतूद कमी अधिक करण्याचे अधिकार या दोघांना प्रदान करण्यात येत आहेत

५.	हा शासन निर्णय वित्त विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ६१२/०३/व्यय-१४, दिनांक १६/७/०३ व क्रमांक: ७३/अर्थोपाय/२००३, दिनांक २५.७.२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.



**(वै.अ.पारकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
प्रधान सचिव, नियोजन विभाग.
प्रधान सचिव, वित्त विभाग.
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग.
सर्व मंत्रालयीन विभाग.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, उच्च व तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक (प्रशिक्षण)/(व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व उपसंचालक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग.
सर्व उपसंचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालये.
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद
सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
सर्व कोषागार अधिकारी
सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग
निवड नस्ती मावक ३.